**पालघर येथे उप प्रादेशिक परिवहन कार्यालय स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह (परिवहन) विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी ०४२५/प्र.क्र.९१/परि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: २१ मे, २०२५

**संदर्भ :**

१. गृह विभाग शासन निर्णय क्र.एमव्हीडी ०८१५/ प्र.क्र. २३३ / परि-४, दि. १८.०६.२०१८.

२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई कार्यालयाचे पत्र क्र. काईबा (११) / ११०१ /न.क्र.०१ /का-१०(१)/२०२५ जा.क्र.४३३६, दि.०७.०४.२०२५.

३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाचे पत्र क्र. पआका/रवका/का-१०/ नविन कार्यालय निर्मीती/पालघर/२०२५/जा.क्र.५९५१, दि. २०.०५.२०२५

**प्रस्तावना :**

पालघर जिल्हयातील वाहन नोंदणी संख्या, एकूण लोकसंख्या यांचा विचार करता पालघर येथे स्वतंत्र उप प्रादेशिक परिवहन कार्यालय स्थापन करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

पालघर येथे उप प्रादेशिक परिवहन अधिकारी दर्जाचे MH - 60 या नोंदणी क्रमांकासह नवीन कार्यालय सुरु करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याबाबत शासनाच्या प्रचलित धोरणानुसार नवनिर्मित उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, पालघर या कार्यालयासाठी आवश्यक पदे निर्माण करण्यात येतील, तुर्तास सदर कार्यालयासाठी विहीत मानांकनानुसार आवश्यक पदे इतर कार्यालयातून समायोजित करण्याची पुढील कार्यवाही परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांनी नियमानुसार करावी.

३. सदरील नवीन कार्यालय सुरु करण्यासाठी शासकीय/खाजगी मालकीची जागा भाडे तत्वावर घेण्याची पुढील कार्यवाही परिवहन आयुक्तांनी तात्काळ करावी.

४. सदर नवनिर्मित कार्यालयासाठी १ इंटरसेप्टर वाहनास मंजूरी देण्यात येत आहे. सदर वाहन घेण्यापूर्वी वाहन आढावा समितीची मान्यता घेण्यात यावी.

५. सदर कार्यालयासाठी येणाऱ्या अंदाजित आवर्ती खर्च व अनावर्ती खर्चाची तरतूद आगामी अधिवेशनात पुरवणी मागणीव्दारे करुन देण्यात येईल. याबाबतचा प्रस्ताव परिवहन आयुक्त यांनी शासनास सादर करावा. तोपर्यंत सदर खर्च उपलब्ध कार्यालयीन खर्चातून भागविण्यात यावा.

६. पालघर येथे नवीन होणाऱ्या उप प्रादेशिक परिवहन कार्यालयाकरीता एमएच- ६० (MH- 60) हा कार्यालय नोंदणी क्रमांक देण्यात येत आहे.

७. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, पालघर यांना सदर कार्यालयाचे 'कार्यालय प्रमुख' तसेच 'आहरण व संवितरण अधिकारी' म्हणून घोषित करण्यात येत असून मुंबई वित्तीय नियमावली, १९५९ व महाराष्ट्र नियम, १९६८ नियम १५ (३) मध्ये नमूद केलेल्या अधिकारांचा त्यांना वापर करता येईल.

८. मोटार वाहन कायदा व नियमातंर्गत नोंदणी प्राधिकारी, अनुज्ञप्ती प्राधिकारी तसेच महाराष्ट्र मोटार वाहन कर अधिनियम अंतर्गत 'कराधान प्राधिकारी' म्हणून उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, पालघर यांना घोषित करण्यात येत आहे.

९. सदर उप प्रादेशिक परिवहन कार्यालय सुरु करण्याकरीता येणारा खर्च मागणी क्र.बी-३,मुख्य लेखाशिर्ष २०४१ वाहनांवरील कर (००)(००१) संचालन व प्रशासन (०२)(०१) प्रादेशिक कार्यालये, दत्तमत्त (योजनेतर) (२०४१ ००३६) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१०. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी पालघर येथे उप प्रादेशिक परिवहन अधिकारी दर्जाचे नवीन कार्यालय स्थापन करणेबाबत नियमानुसार पुढील सर्व कार्यवाही करुन वेळोवेळी शासनास अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२११२१०२७८०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2025.05.21 12:11:12 +05'30'

**( सु.बा.आपटे )**
**अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
७. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
८. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. प्रादेशिक परिवहन अधिकारी, वसई
१०. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, पालघर.
११. जिल्हा कोषाधिकारी, जिल्हा पालघर.
१२. निवडनस्ती/परि-४.